**बुलडाणा जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकेस महाराष्ट्र राज्य सहकारी बँकेकडून रु.३०० कोटी मध्यम मुदतीचे कर्ज उचल करण्याचा कालावधी दोन वर्षाचा करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**
**शासन निर्णय क्रमांक-संकीर्ण-२०२४/सहकार/प्र.क्र.१७/अर्थबळ**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक - २०/०२/२०२५

वाचा:- १) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. शासन हमी-१०९९/प्र.क्र.६८/ शासन हमी, दि. ५.११.१९९९.
२) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. शाहमी १००८/प्र.क्र.१८/शा हमी, दि. २८.०४.२००८.
३) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. शाहमी-२०२४/ सहकार/प्र.क्र.१७/अर्थबळ,दि.१४.०३.२०२४
४) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. संकीर्ण-२००९/प्र.क्र.४१/अर्थबळ, दि.३०.०९.२०२४

**प्रस्तावना :-**

मा. मंत्रीमंडळाच्या दि.११.०३.२०२४ रोजीच्या बैठकीत बुलडाणा जिल्हा मध्यवर्ती सहकार बँकेची आर्थिक स्थिती विचारात घेऊन बँकेस महाराष्ट्र राज्य सहकारी बँकेकडून रु. ३०० कोटी मध्यम मुदत कर्ज मंजूर होण्यासाठी शासन थकहमी मंजूर करण्यास तसेच बँकेस शासन थकहमी देण्यासाठी महाराष्ट्र राज्य सहकारी बँकेने शासनास सादर केलेल्या हमी कराराच्या मसुद्यात हमी करार करण्यास व बँकेस मंजूर करावयाच्या रु. ३०० कोटी मध्यम मुदत कर्जाच्या परतफेडीसाठी दोन वर्षाचा अधिस्थगन कालावधी (moratorium) व पाच वर्षाचा परतफेडीचा कालावधी (एकूण सात वर्षे) मंजूर करण्यास मान्यता दिली आहे . त्यानुषंगाने दि.१४.०३.२०२४ रोजीचा शासन निर्णय निर्गमित करण्यात आला आहे.

यानुषंगाने बुलडाणा जिल्हा मध्यवर्ती सहकार बँकेस महाराष्ट्र राज्य सहकारी बँकेकडून कर्ज उचल करण्याचा कालावधी दोन वर्षाचा (सन २०२४-२५ व सन २०२५-२६) करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

१. आता, वित्त विभाग, शासन निर्णय, दि.१४.०३.२०२४ मधील अ.क्र.५ मध्ये खालीलप्रमाणे सुधारणा करण्यात येत आहे :-

५) बुलडाणा जिल्हा मध्यवर्ती सहकार बँकेस महाराष्ट्र राज्य सहकारी बँकेच्या कर्ज मंजूरीमध्ये कर्जाची उचल सन २०२४-२५ मध्ये रु.२०० कोटी व सन २०२५-२६ मध्ये रु.१०० कोटी अशी करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. हमी शुल्क:- वित्त विभाग, शासन निर्णय, दि.३०.९.२०२४ अन्वये प्रचलित हमी शुल्काचे दर द.सा.द.शे.रु.२ वरुन द.सा.द.शे.रु.०.५० इतके करण्यात आले असून, सदर शासन हमीशुल्काचे सुधारित दर दि.१ एप्रिल २०२३ पासून मंजूर केलेल्या शासन हमीला लागू राहतील. तसेच यापुढे कोणत्याही प्रकरणी शासन हमीसाठी हमी शुल्क माफ केले जाणार नाहीत.

३. बुलडाणा जिल्हा मध्यवर्ती सहकार बँकेस एकूण रु.३०० कोटींची (रु.तीनशे कोटी) शासन हमी देणेसंदर्भात उपरोक्त परि.१ व २ वगळता, वित्त विभाग, शासन निर्णय, दि.२८.०४.२००८ च्या शासन निर्णयामध्ये नमूद केलेल्या सर्व अटी व शर्ती कायम राहतील.

४. हा शासन निर्णय सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, कार्यासन-२ स यांच्या नस्ती क्र.संकीर्ण ०८२३/प्र.क्र.६१/२-स वरील प्रस्ताव व वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.शासन हमी क्र. ६/२०२४-२५ नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. प्रस्तुत सुधारित शासन निर्णयाच्या अनुषंगाने, विभागाने पुरवणी शासन हमी करार (Supplementary Guarantee Deed) करुन त्यामध्ये सदर शासन निर्णयातील अटी व शर्ती मान्य असल्याचे नमूद करणे आवश्यक राहील.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असुन त्यांचा सांकेतांक २०२५०२२०१४४९४४०२०५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने

Digitally signed by SUNIL SHANKAR SHINDE
Date: 2025.02.20 14:51:07 +05'30'

**(सुनिल शिंदे)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव.
२) मा. सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
३) मा. अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
४) मा. विरोधी पक्षनेता, विधानपरिषद/विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
५) मा. उपसभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
६) मा. उपाध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
७) सर्व सन्माननिय सदस्य विधानपरिषद/ विधानसभा महाराष्ट्र विधानमंडळ सदस्य, विधानमंडळ, मुंबई.
८) मा.मुख्यमंत्र्यांचे अपर मुख्य सचिव.
९) उप मुख्यमंत्री (वित्त) यांचे खाजगी सचिव / उप मुख्यमंत्री (नगरविकास) यांचे खाजगी सचिव.
१०) सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
११) महालेखापाल, महाराष्ट्र- १/२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई / नागपूर.
१२) महालेखापाल, महाराष्ट्र- १/२ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई / नागपूर.
१३) ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानभवन सचिवालय, मुंबई, (५प्रती)
१४) भारतीय जनता पार्टी, महाराष्ट्र प्रदेश, सी.डी.ओ. बॅरेक्स क्र.१, योगक्षेमसमोर, वसंतराव भागवत चौक, नरिमन पॉईन्ट, मुंबई-४०० ०२०.
१५) इंडियन नॅशनल कॉग्रेस पार्टी, महाराष्ट्र प्रदेश कॉग्रेस (आय) समिती, टिळक भवन, काकासाहेब गाडगीळ मार्ग, दादर, मुंबई-४०००२५.
१६) नॅशनॅलिस्ट कॉग्रेस पार्टी, ठाकरसी हाऊस, जे.एन. हेरेडीया मार्ग, बेलार्ड इस्टेट, मुंबई.

१७) शिवसेना, शिवसेना भवन, गडकरी चौक, दादर, मुंबई-४०००२८.
१८) बहुजन समाज पार्टी,म.रा.,बी.एस.पी. भवन, प्लॉट नं.८३-ए,कलेक्टर कॉलनी चेंबूर, मुंबई-४०००१४.
१९) भारतीय कम्युनिस्ट पार्टी, महाराष्ट्र कमिटी, ३१४, राज भवन, एस.व्ही. पटेल रोड, मुंबई-०४.
२०) भारतीय कम्युनिस्ट (मार्क्सवादी) पार्टी महाराष्ट्र कमिटी,जनशक्ती हॉल,ग्लोब मिल पॅलेस, वरळी,मुंबई-२८.
२१) महाराष्ट्र नवनिर्माण सेना, राजगड, मातोश्री टॉवर शिवाजी पार्क, दादर, मुंबई-२८.
२२) अपर मुख्य सचिव, सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
२३) ) वित्त विभाग (ऋण व हमी नियंत्रण कक्ष), मंत्रालय, मुंबई.
२४) कार्यासन अधिकारी-२ स,सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई--४०० ०३२.
२५) संबंधित वित्तीय संस्था (विभागामार्फत).
२६) निवड नस्ती -अर्थबळ ---------